**५७ वा, ५८ व ५९ व्या महाराष्ट्र राज्य मराठी चित्रपट पुरस्कार सोहळ्याच्या आयोजनाकरीता वित्तीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : मचिम-२०२४/प्र.क्र.६६/सां.का.१**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २४ मार्च, २०२५

**वाचा :**१. शासन निर्णय, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग क्र.मचिम-२०२४/प्र.क्र.२२/सां.का.१, दि.२१.०२.२०२४.
२. शासन ज्ञापन, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग क्र.मचिम-२०२४/प्र.क्र.२२/सां.का.१, दि.०४.०३.२०२४.
३. शासन निर्णय, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग क्र.मचिम-२०२४/प्र.क्र.२२/सां.का.१, दि.२८.०१.२०२५.
४. शासन निर्णय, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग क्र.मचिम-२०२४/प्र.क्र.६६/सां.का.१, दि.१४.०८.२०२४.
५. शासन ज्ञापन, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग क्र.मचिम-२०२४/प्र.क्र.६६/सां.का.१, दि.१०.१०.२०२४.
६. महाराष्ट्र चित्रपट, रंगभूमी आणि सांस्कृतिक विकास महामंडळ, गोरेगाव, मुंबई यांचे क्र/१२.वि.ज/.पु.रा.म/२०२४-संकीर्ण.०७/३५, दि.१५०.१२०२.५ चे पत्र
७. महाराष्ट्र चित्रपट, रंगभूमी आणि सांस्कृतिक विकास महामंडळ, गोरेगाव, मुंबई यांचे क्र/१२.वि.ज/.पु.रा.म/२०२४-संकीर्ण.०७/३६, दि.१५०.१२०२.५ चे पत्र

**<u>प्रस्तावना :</u>**

उपनिर्दिष्ट १ अन्वये, महाराष्ट्र राज्य मराठी चित्रपट पुरस्कार व पुरस्कार सोहळ्याचे आयोजनाकरीता रुपये २.०० कोटी व संदर्भ क्र. ३ अन्वये रुपये २,७८,१४,५००/- अशा एकूण रुपये ४,७८,१४,५००/- इतक्या रकमेस प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती. त्यानुषंगाने, संदर्भ क्र. २ रोजीच्या ज्ञापनान्वये रुपये २.०० कोटी इतका निधी सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात मंजूर तरतूदीतून महाराष्ट्र चित्रपट, रंगभूमी आणि सांस्कृतिक विकास महामंडळ, गोरेगाव यांना सदर पुरस्कार सोहळ्यासाठी वितरित करण्यात आला होता.

तसेच, संदर्भ क्र. ४ अन्वये ५८ व ५९ व्या महाराष्ट्र राज्य मराठी चित्रपट पुरस्कार व पुरस्कार सोहळ्याचे आयोजनाकरीता रुपये ४,६३,१९,८३५/- प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली होती. संदर्भ क्र. ५ अन्वये, रुपये १.८० कोटी इतका निधी महामंडळास ५८ व ५९ व्या महाराष्ट्र राज्य मराठी चित्रपट पुरस्कार वितरण व आयोजनावरील खर्चास्तव वितरित करण्यात आला होता.

आता, ५७ वा, ५८ व ५९ व्या महाराष्ट्र राज्य मराठी चित्रपट पुरस्कार व पुरस्कार वितरण आयोजनावरील खर्चास्तव महामंडळाद्वारे करण्यात आलेल्या खर्चाची प्रतिपूर्ती करण्याची विनंती संदर्भ क्र. ६ व ७ च्या पत्रान्वये करण्यात आली आहे. तरी, सदर निधीस वित्तीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय :</u>**

५७ वा तसेच ५८ व ५९ व्या महाराष्ट्र राज्य मराठी चित्रपट पुरस्कार वितरण व पुरस्कार सोहळ्याच्या आयोजनासाठी महाराष्ट्र चित्रपट, रंगभूमी आणि सांस्कृतिक विकास महामंडळ, गोरेगाव यांच्याद्वारे खालील प्रमाणे करण्यात आलेला एकूण खर्च रुपये ५.३३ कोटी/- (रुपये पाच कोटी तेहतीस लक्ष फक्त) इतक्या रकमेस प्रतिपूर्ती करण्यासाठी वित्तीय मान्यता देण्यात येत आहे:-

| अ.क्र. | लेखाशिर्ष | रुपये |
|---|---|---|
| १. | (२२०५ १५४३)०५-बक्षिसे | १०.०० लक्ष |
| २. | लेखाशिर्ष (२२०५ १५४३)५०-इतर खर्च | ५२३.०० लक्ष |

**०२.** यावर होणारा खर्च "मागणी क्रमांक झेडडी-०२, २२०५ कला व संस्कृती (००) १०२, कला संस्कृती प्रचालन (०३) (०१) मराठी चित्रपट महोत्सव (२२०५ १५४३) ०५-बक्षिसे व ५०-इतर खर्च " या लेखाशिर्षाखाली सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाच्या उपलब्ध तरतुदीतून भागविण्यात यावा. <u>सदरचे अनुदान बिनशर्त आहे.</u>

**०३.** सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या सहमतीने अनौपचारीक संदर्भ क्र.११०**/का-१४४३,** दि.१५ फेब्रुवारी, २०२५ आणि वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.१७३/२०२५/व्यय-१५ दि. ११ मार्च, २०२५ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार तसेच वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि. १२ फेब्रुवारी, २०२५ अन्वये विहित अटी व शर्ती पूर्ततेच्या अधिन मान्यता देण्यात येत आहे.

**०४.** या प्रयोजनार्थ उप सचिव, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत असून अवर सचिव (रोखशाखा), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. त्यांनी व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र चित्रपट, रंगभूमी आणि सांस्कृतिक विकास महामंडळ मर्यादित, दादासाहेब फाळके चित्रनगरी, गोरेगाव, मुंबई यांना सदर रक्कम एकरकमी वितरित करावी.

**०५.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०२५०३२४१७१२४८३९२३ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

ANIROODHA SURYAKANT DESHPANDE

Digitally signed by ANIROODHA SURYAKANT DESHPANDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL AFFAIRS DEPARTMENT, 2.5.4.20=d34fa92fd12dd57b9647dbd172129b5c0eb8b1cd7ff442b98831311214458302, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=0D09B1312327B281B742D56CD04EE1899269D4FAAF88991AC3364BDCC437CF37, cn=ANIROODHA SURYAKANT DESHPANDE
Date: 2025.03.24 17:14:39 +05'30'

**(अनिरुध्द सू. देशपांडे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.मंत्री (सांस्कृतिक कार्य) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. अपर मुख्य सचिव, सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र चित्रपट, रंगभूमी आणि सांस्कृतिक विकास महामंडळ, मुंबई.
४. महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता )-एक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
५. महालेखापाल ( लेखापरीक्षा )-एक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
७. निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई.
८. नियोजन विभाग (का.१४४३), मंत्रालय, मुंबई
९. वित्त विभाग (व्यय-१५, अर्थसंकल्प) मंत्रालय, मुंबई
१०. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई - यांना विनंती करण्यात येते की, उक्त अनुदानाची रक्कम BDS द्वारे उपलब्ध करुन देण्यासंदर्भातील कार्यवाही करण्यात यावी.
११. अवर सचिव (रोख शाखा), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई- यांना विनंती करण्यात येते की,सदर शासन निर्णयातील नमूद रक्कम व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र चित्रपट, रंगभूमी आणि सांस्कृतिक विकास महामंडळ, गोरेगाव, मुंबई यांच्या नावे वितरित करण्यात यावी.
१२. निवड नस्ती - सां.का.१.